राज्य आपत्ती प्रतिसाद दलात कार्यरत अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी निधी मंजूर करण्याबाबत.......

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक :- डीएमयू-२०११/प्र.क्र.२२१/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २०.०२.२०१७

**वाचा :-** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- डीएमयू-२०११/प्र.क्र.२२१/आव्यप्र-१, दिनांक ३०.०८.२०१४.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- डीएमयू-२०११/प्र.क्र.२२१/आव्यप्र-१, दिनांक १९.०५.२०१६.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- डीएमयू-२०११/प्र.क्र.२२१/आव्यप्र-१, दिनांक ०३.११.२०१६

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य हे आपत्ती प्रवण राज्य आहे. राज्यास नैसर्गिक तसेच मानवनिर्मित आपत्तींना तोंड द्यावे लागते. ही पार्श्वभूमी विचारात घेऊन, राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दल (N.D.R.F.) च्या धर्तीवर राज्यात राज्य आपत्ती प्रतिसाद दलाच्या दोन कंपन्या (२७० पदे) आणि या कंपन्यांच्या आस्थापनाविषयक तसेच इतर संलग्न बाबी हाताळण्याकरिता मुख्यालयात १५८ पदे अशी एकूण ४२८ अधिकारी/ कर्मचारी यांची पदे संदर्भाधीन क्रमांक ०१ येथील शासन निर्णयान्वये मंत्रिमंडळाच्या मान्यतेने पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आली आहेत.

राज्य आपत्ती प्रतिसाद दलासाठी प्रथमच पदनिर्मिती करण्यात आली आहे. राज्य आपत्ती प्रतिसाद दलाची आस्थापना आणि इतर अनुषंगीक बाबींसाठी महालेखापाल ( ले. व अ.) -१, मुंबई यांच्या मान्यतेने नवीन लेखाशिर्ष २२४५ २५७९ उघडण्यात आले आहे. राज्य आपत्ती प्रतिसाद दलातील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या जूलै, २०१६ ते नोव्हेंबर, २०१६ पर्यंतच्या वेतनावरील खर्च भागविण्यासाठी संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये रू.५,९४,८८,०००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता सन २०१६-१७ या वर्षात डिसेंबर, २०१६ ते फेब्रुवारी, २०१७ या कालावधीतील वेतनासाठी होणा-या खर्चासाठी निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात स्थापन करण्यात आलेल्या राज्य आपत्ती प्रतिसाद दलात नियुक्त केलेल्या एकूण ४२८ अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे माहे डिंसेबर २०१६ ते फेब्रुवारी २०१७ या कालावधीतील वेतनावरील खर्च भागविण्यासाठी रुपये ४,४६,१६,०००/- (रुपये चार कोटी सेहेचाळीस लाख सोळा हजार फक्त) इतका निधी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना उलब्ध करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर रु. ४,४६,१६,०००/- (रुपये चार कोटी सेहेचाळीस लाख सोळा हजार फक्त) एवढा निधी सन २०१६-१७ करिता पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक सी-६
लेखाशिर्ष क्रमांक २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय (योजनेतर)
८० सर्वसाधारण
००१ संचालन व प्रशासन
(९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च
(९२) (०३) राज्य आपत्ती प्रतिसाद दलाची आस्थापना व इतर अनुषंगीक बाबी
०१- वेतन (२२४५ २५७९)

या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला रु. ४,४६,१६,०००/- (रुपये चार कोटी सेहेचाळीस लाख सोळा हजार फक्त) निधी कोषागार कार्यालयातून आहरित करण्यासाठी सहाय्यक समादेशक, राज्य आपत्ती प्रतिसाद दल, नागपूर आणि सहाय्यक समोदशक, राज्य आपत्ती प्रतिसाद दल, धुळे यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने आणि त्या विभागाचा अनौपचारी संदर्भ क्रमांक ३१/२०१७/व्यय-९, दिनांक ०६.०२.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असुन संकेतांक क्रमांक २०१७०२२०१७२३३०२११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrirang Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2017.02.20 17:24:51 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य , मुंबई.
४) प्रधान सचिव, आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, पशुसंवर्धन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) महालेखापाल-१/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
७) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
९) अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस दल, महाराष्ट्र राज्य , मुंबई.

१०) संचालक व अपर पोलीस महासंचालक, बिनतारी संदेश विभाग, महाराष्ट्र राज्य मुंबई.
११) समोदशाक , राज्य राखीव पोलीस बल गट क्रमांक -४, नागपूर आणि ६, धुळे.
१२) कक्ष अधिकारी, (व्यय-९ आणि अर्थसंकल्प -६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) स्वीय सहाय्यक, अ.मु.स.(म. व पु.) मंत्रालय, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी (ब-१), म. व व. विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवड नस्ती.